विधीलीखीतान्वये चित्रमा आणि सुरोचन या गंधर्वांची शापांतून मुक्ती झाली. कमठ कुंभारानेही या शापमुक्तीसाठी मोलाचे प्रयत्न केले. सुरोचन सत्यवतीला पुत्रलाभ झाला. पुत्रमुख पाहून सुरोचन गंधर्वलोकीही परतला. त्यांचा पुत्र हा अतिशय देखणा, विद्याविभूषित व शस्त्रविद्येतही त्याची पारंगतता अतिशय लक्ष वेधणारी होती आणि म्हणून त्याला राजसेवक होण्याची संधी मिळाली. आपली चाकरी बजावत असताना त्याने हेरले की व्यापाऱ्यांसोबत असणाऱ्या भर्तरी नामक युवकाचे भाकीत तंतोतंत खरे ठरते. युक्तीप्रयुक्तीने विक्रमाने भर्तरीसमवेत स्नेह वढवला. त्या दोघांची दाट मैत्री जमली आणि भर्तरी विक्रमसोबत त्याच्या घरी राहू लागला. विक्रमची माता त्याच्यावर स्वपुत्रासारखी मायाममता करू लागली, लौकिक अर्थाने विक्रम आणि भर्तरी भावासमानच वागत असत.

अवंतिका नगरीच्या वेशीवरील चौकीवर भर्तरी आणि विक्रम हे जकातीनिमित्त पहारेकाऱ्यांचे काम करीत असताना अनपेक्षितपणे त्यांचा भाग्योदय झाला. त्याची कथा अशी की, अयोध्या, मथुरा, द्वारका, काशी, कांची, माया आणि अवंतिकापुरी या सात नगरींची मोक्षपुण्या अशी गणना होते. त्यांपैकी अवंतिकापुरी नगरीत शुभविक्रम नावाचा पराक्रमी राजा राज्य करीत होता. त्याला सुमेधावती नावाची कन्या होती. मदनपत्नी रतीनेसुद्धा तिच्यापुढे लज्जित व्हावे असे तिचे सौंदर्य होते. एके दिवशी महाराज शुभविक्रम ह्यांच्या राजसिंहासना शेजारी ही रुपगर्विता येऊन बसली. तारुण्याने बहरलेले तिचे लावण्य पाहून राजाचे पितृत्व विचार करू लागले. त्यांनी सुमती नावाच्या महामंत्र्याला बोलाविले आणि म्हणाले, “महामंत्रीजी! राजकन्या, सुमेधावती आता उपवर दिसू लागली आहे. लवकरच हिच्यासाठी योग्य, देखणा वर शोधणे भाग आहे असे वाटते.” “महाराज आपण योग्य विचार केला आहे. आता आपणही वार्धक्याकडे झुकू लागले आहात. राज्यासाठी सुद्धा पुत्र वारस नाही आणि ही समस्या राजकुमारी सुमेधावतीच्या माध्यमातून सुटू शकते असे वाटते. ज्या भाग्यशाली युवकाला आपण सुमेधावती देणार आहात, त्यालाच राजगादीवर बसविणे उचित होईल. कन्या अर्पण करून जावयाचा पुत्र म्हणून स्वीकार करावा, असे माझे मत आहे.” महामंत्र्यांनी महराजांच्या प्रश्नाचे उत्तर दिले. त्यावर महाराज म्हणाले, “महामंत्री आपण योग्य विचार व्यक्त केला आहे पण तो कृतीत आण्यासाठी सुलक्षणी वराची निवड होणे आवश्यक आहे. त्यानंतर त्याचा राज्याभिषेक करून त्याला राजा म्हणून जाहीर करावा आणि नंतर त्याला राजकन्या अर्पण करावी, म्हणजे प्रेथेप्रमाणे कार्यवाही ठरेल. प्रचलित पद्धतीप्रमाणे सुभमुहूर्त पाहून एका सुलक्षणी हत्तीच्या सोंडेत पुष्पमाला समारंभपूर्वक द्यावी. तो हत्ती ज्या भाग्यवंताच्या कंठात माळ अर्पण करेल त्याला राज्य आणि राजकन्या अर्पण करू.”

या शुभकार्याच्या अनुषंगाने नगरीत सर्वत्र दवंडी फिरवून सूचना करण्यात आली. राजवाडा आणि नगरी गुड्या, तोरणे पताकांनी सजविण्यात येऊन पदपथांवर सडासंमार्जन करून रांगोळ्या रेखण्यात आल्या. एका सुलक्षणी गजाला सुवर्णजडित कशिदा कारागिरी केलेली झूल चढवून शृंगारण्यात आले. सोंडेत पुष्पमाला घेऊन तो सुशोभित गजराज नगर प्रदक्षिणेस निघाला. त्याच्यामागे महाराज, मंत्रीगण, सरदारादी प्रतिष्टीत मान्यवर चालले होते. हत्तीने प्रारंभी सभामंडपातील सर्व उपस्थित मंडळींना बारकाईने न्याहाळले आणि आपली गती नगरीकडे वळवली, ठीकठिकाणी चौकाचौकात उभे राहून नगरजन उत्सुकतेने हा सोहळा पाहत होते. हत्ती संपूर्ण नगरी फिरला आणि ज्या दुर्ग चौकीवर भर्तरी आणि विक्रम होते, तिथे जाऊन थांबला. तेथून पुढे हलेना, सोंड उंचावून चौकीच्या वरच्या मजल्याकडे पाहत

चित्कार करू लागला. तेथे आठ राजसेवक काम करीत होते. त्यांना खाली उतरण्याची आज्ञा करण्यात आली. राजाज्ञेचे पालन करीत सार्वजण पायऱ्या उतरून खाली आले. सर्वांत शेवटी विक्रम उतरला, तो उतरताच गजराज आनंदून धावत गेला आणि विजयमाला त्याच्या गळ्यात घातली. सर्वांनी जयजयकार केला. वद्यांचा मंगलमय गजर आणि उत्स्फूर्त जयजयकार यामुळे आकाश दुमदुमन गेले. हत्तीवरून मिरवणूक काढून विक्रमाला राजवाड्यातील सभामंडपात आणले, सर्वत्र आनंदीआनंद झाला होता. राजा आणि मंत्रीगण ह्यांच्या करिता असलेल्या खास आसनपंक्तीमधील सुवर्णजडित सिंहासनावर विक्रमास बसविण्यात आले. मग सहज चर्चा, वास्तुपुस्त करीत असताना जातीसंबंधी विचारणा झाल्यावर 'कुंभार' जातीचा उल्लेख होताच राजा मनातून खिन्न झाला. महामंत्री सुमती यांस एकांतात नेऊन राजांनी कुंभार या शब्दाकडे लक्ष वेधून म्हणाले, "महामंत्रीजी! मला हे पटत नाही, आम्ही पराक्रमी क्षत्रिय कुलोत्पन्न असून कुंभार पुत्रास राजकन्या कशी द्यावी? हा, दर्शनी मात्र तो कुंभार जरी वाटत नसला तरीही..." महामंत्री सुमतीही विचारात पडले पण अंतिम निर्णय घेण्यापूर्वी सखोल चौकशी करण्याच्या हेतूने राजासह ते मंडपाबाहेर आले आणि विक्रमच्या आठ सहकारी राजसेवकांकडे त्याच्या जातीविषयी चौकशी केली. तरी देखील उकल झाली नाही. ते म्हणाले, माहित नाही पण सर्वजण त्याला कुंभारच समजतात. सुमतीने विक्रमच्या तथाकथित पित्याला बोलावणे पाठविले, एकांतात नेऊन विचारपूस केली असता कमठ कुंभार म्हणाला, "महाराज! मथूराधीपती सत्यवर्मा राजाची राजकन्या ही विक्रमाची माता आहे. तिचे नाव सत्यवती आणि त्याचा पिता साक्षात गंधर्वराज सुरोचन हे आहेत, मी केवळ त्यांचा नामधारी पालनकर्ता आहे." हे ऐकून महामंत्र्यांना समाधान वाटले. कमठवाणी ऐकून राजालाही आनंद झाला. सुमती महाराजांना म्हणाला, "महाराज! मी या कमठास घेऊन मथुराधिपतीच्या भेटीसाठी जाऊ इच्छित आहे. आम्हास आज्ञा द्यावी." राजाने त्यांना त्वरित निघण्याची आज्ञा देऊन त्यांची रवानगी केली.

मथुरानगरीत राजा सत्यवर्माने त्यांचे सहर्ष स्वागत केले. राजमहालात एकांती बसून वार्तालाप करताना कमठाने सत्यवर्मास शुभवर्तमान सांगितला, "राजकन्या सत्यवतीच्या उदरी सुरोचन गंधर्वापासून विक्रमाचा जन्म झाला. आता विक्रमाचे भाग्य उदयास आले असून आपल्या नातवास राजेपण प्राप्त होणार असल्याने, आता सर्व इतिहास या सुमती महामंत्र्यास कथन करून कृपा करावी." हे ऐकून, मथुराधिपती आनंदित झाले. नंतर त्यांनी कमठाच्या घरी घडलेली भूतकाळातली सत्यकथा ऐकविली. महाराज सत्यवर्मा स्वतः अवंतिकापुरीस जाऊन महाराज शुभविक्रमास भेटले; सत्यवती, पिता सत्यवर्मांना भेटली आणि चर्चेच्या ओघात संशयाचे मळभ दूर झाले. सर्वांचे मनापासून समाधान झाले. त्यानंतर अवंतिका नगरीमध्ये एका मंगल मुहूर्तावर वाद्यांच्या गजरात विक्रमाचा राज्याभिषेकविधी संपन्न झाला. राजसेवक विक्रम आता विक्रम राजा झाला आणि शिरावर छत्र चामरे मिरवु लागली. छत्रपती विक्रमराजाने असंख्य याचकांना धनदान देऊन तृप्त केले.

राज्याभिषेकानंतर विवाहाचा मंगळ सोहळा आयोजित करून शुभविक्रमाने कन्या सुमेधावती विक्रमास अर्पण केली. या मंगल विवाहाचे औचित्य साधत सत्यवर्माने मथुरेचे राज्यही स्वतःच्या नातवास; विक्रमास आंदण म्हणून दिले. म्हणजे आता विक्रम अवंतिकापुरी आणि मथुरा या दोन राज्याचा सार्वभौम राजा झाला. विक्रमाने भर्तरीची युवराज म्हणून नेमणूक केली आणि दोघे भाऊ अवंतिकेहून राज्यकारभार करू लागले. दरम्यान महामंत्री सुमती यांना वाटले की आपली उपवर कन्या पिंगला भर्तरीस द्यावी. त्या अनुषंगाने त्यांनी राजा विक्रमाच्या कानावर हा विषय घातला आणि त्यांच्या अनुमतीने विवाहाचा मुहूर्त नक्की करण्यात आला पण त्यांत अनपेक्षित विग्न आले. एका परीटाने या विवाह

संबंधाबाबत नाहक गैर वक्तव्य केले आणि भर्तरीच्या जातीचा शोध करावा अशीही पुस्ती जोडली. त्यामुळे वातावरण गढूळ झाले. संशयाचे निराकरण करण्यासाठी पुनश्च कमठ कुंभाराला बोलविण्यात आले. त्याच्याकडे विचारपूस केली असता, त्याने आपल्याला काहीही माहिती नसल्याचे सांगितले. मग राजमाता सत्यवतीला विचारण्यात आले, "भर्तरी तुमचा मुलगा हे खरे आहे काय? तेव्हा राजमाता म्हणाली, "भर्तरी माझ्या उदरातून जन्मलेला नाही पण मी त्याला पुत्र मानते, मी त्याची जन्मदात्री माता नसून धर्माची माता आहे." मग महामंत्री सुमतीने विक्रमराजाला भेटून चौकशी केली तेव्हा विक्रम म्हणाला, "कोणती जात ते माहित नाही आणि एकदा बंधू मानल्यानंतर जातीपातीचा क्षुद्र विचारभेद मनात आला नाही.

मग खुद्द भर्तरीला याबाबत विचारले असता तो म्हणाला, "मी साक्षात सूर्यपुत्र आहे. अरण्यामध्ये एका हरिणीने माझा सांभाळ केला, त्यानंतर जयसिंग आणि रेणुका या भट दांपत्याने मला वाढविले. त्यांच्या निधनानंतर मी व्यापाऱ्यांच्या समवेत येथे आलो आहे. भर्तरीने खरेखुरे वास्तव कथन केले. तथापि महामंत्र्यांचा विश्वास बसला नाही, त्यांना वाटले की स्वतःचा स्वार्थ साधण्यासाठी हा खोटे बोलतो आहे. पिता सूर्यदेव आहे, असं म्हणतोय! तर याच्याकरवी सूर्यालाच विवाह सोहोळ्यानिमित्त बोलवावे. म्हणजे संशयाचे निराकरणच होईल. असा विचार करून महामंत्री सुमती भार्तरीस म्हणाला, "प्रत्यक्ष सूर्यदेव तुमचा पिता आहे म्हणतां तर त्यांना विवाहविधीस बोलावून आमची भेट घडवा. भर्तरी तुमची माता आहे आणि ती भग्न झाली असे म्हणतां पण पिताश्री सूर्य देवांना लग्नविधीसाठी बोलावून घ्यावे."

"अवश्य! त्यांत काय विशेष?" असे म्हणून राजप्रसादासमोरील खुल्या अंगणात उभा राहून आकाशाकडे दृष्टी करून भर्तरीने साद घातली. "हे सूर्यदेवा! जन्मदात्या!! मी जर खरोखर आपल्या तेजस्वी रेतापासून जन्म घेतला असेल तर पुत्र प्रेमाखातर आपण धरतीवर यावे." भर्तरीने सूर्यदेवांचे ध्यान करताच त्यांना ते जाणवले आणि त्वरेने चक्राकार फिरणाऱ्या वाऱ्याच्या रूपाने घोंगावत ते अवंतिकेत येऊन महामंत्री सुमतीस म्हणाले, "अहो, महामंत्रीजी! सगळया शंकाकुशंका सोडून माझा पुत्र भर्तरी यांस आपली कन्या द्यावी. विवाहासाठी वराचा पिता हजर असावा असे आपण म्हणता! त्यापेक्षा मी देवदेवतांकडून पुष्पवृष्टी करण्याची सोय करतो. त्याव्यतिरिक्त विक्रमपिता गंधर्व सुरोचानांस या विवाह सोहळयासाठी पाठवीन. कारण मी जर प्रकट स्वरूपात पृथ्वीवर उतरलो तर माझ्या तेजाच्या दाहकतेने सृष्टी जळू लागेल. तेव्हा सर्व संशय, शंका सोडून तुझी कन्या; पिंगला माझ्या पुत्रास अर्पण कर." सूर्यदेवाने सर्व शंकांचे निरसन केल्याने लग्न सोहळा निश्चित झाला. ठरविलेल्या शुभ तिथीस सीमांत पूजनाच्या दिवशी स्वर्गातून गंधर्वराज सुरोचन आले. पत्नी सत्यवतीस भेटून विक्रमास बोलाविले. विक्रमाने येताच पित्याच्या चरणांवर डोके ठेवून नमस्कार केला. नंतर सुमती महामंत्र्यांना बोलावून सुरोचानाची आणि त्यांची भेट घडविली. सुरोचन गंधर्वाचे दिव्य, तेजपुंज आणि औलोकिक रूप पाहून महामंत्री सुमती अतिशय प्रभावित झाला, अति नम्रतेने वागू लागला. त्याला समीप बसवून गंधर्वराज म्हणाले, "महामंत्रीजी! आपण परम भाग्यवंत आहात कारण प्रत्यक्ष द्रुमिलनारायण आपणास जामात म्हणून लाभले आहेत. भर्तरी हा सूर्यतेजधारी अवतारी पुरुष असून तो तुमचा जावई होत आहे यावरून तुम्ही खरेच दैववान आहात." हात जोडत नम्रतेने सुमती म्हणाले, "खरोखर माझे भाग्य उत्तम आहे कारण प्रत्यक्ष देव माझे सोयरेसंबंधी झाले आहेत. एका अर्थाने मी तिन्ही जगामध्ये भाग्यशाली आहे. हे गंधर्वराज, सुरोचन महाराज! आता आपण मंडपात चालावे. सीमांतपूजन करून घेऊ या." "अवश्य! म्हणत सुरोचन गंधर्व उठले आणि मानव वेष धारण करून मंडपात आले. सीमांत पूजन विधी संपन्न झाला. वधुवराला आशीर्वाद देतांना स्वर्गातून फुलांचा वर्षाव झाला. मंगलाष्टके झाली.

उपस्थितांनी आनंदाने टाळ्यांचा गजर केला. पाच दिवस लग्नसोहळा साजरा होत होता. सर्व वऱ्हाडी आणि पाहुणेमंडळींना संतुष्ट करून निरोप देण्यात आला. सुरोचन वरपिता व सत्यवती वरमाय म्हणून मिरवत होते. सुरोचन गंधर्व सत्यवतीसह एक महिना अवंतिकेत राहून मग शुभविक्रम राजाची विचारपूस करून स्वस्थानी परतले.

दिवस आणि रात्र असे कालचक्र अव्याहतपणे फरीत आहे. अवंतिकापुरीमध्ये पिंगला ऋतुमती होऊन यौवनात पदार्पण करती झाली. भर्तरी आणि पिंगला यांचे एकमेकांवर जीवापाड प्रेम होते. पुढे भर्तरीने इतर १२०० विवाह केले पण त्यांमध्ये सर्वात आवडती आणि लाडकी पिंगलाच होती. पट्टराणी म्हणून तिलाच मान होता. नवलक्ष नक्षत्रांमध्ये तेजस्वी नक्षत्रनाथ शोभून दिसावा त्याप्रमाणे बाराशे राण्यांमध्ये पिंगला राणी शोभून दिसत होती. युवराजपदी भर्तरीराजा शोभून दिसे आणि त्याच्या निकट बसलेली पिंगला हिरकणीच वाटायची. तेजस्वी किरणांनी सूर्याची शोभा वाढावी किंवा तुपात साखर मिसळल्यावर जो अवीट गोडवा निर्माण होतो त्याप्रमाणे भर्तरीपिंगला एकरूप होऊन नांदत होते. चुंमबकात मिसळलेले लोखंड चुंबक होऊन जाते, किंवा चिखलात मिसळलेले पाणी आपले अस्तित्व हरवून बसते त्याचप्रमाणे भर्तरी आणि पिंगलाचे झाले होते. भर्तरी राज सभेत असला तरी मनात सतत पिंगलाचेच चिंतन करीत असे, जसे अंमली पदार्थ सेवन करणाऱ्या व्यसनी माणसाला अमंलाशिवाय चैन पडत नाही. त्याप्रमाणे पिंगलेचे चंद्रवदन पहिल्याशिवाय भर्तरीस चैन पडत नसे. त्याची प्रीती ही एक औलोकिक बाब होती. त्यांच्या प्रीतीच्या विश्वात तो तिचा प्राणनाथ आणि ती त्याची प्राणेश्वरी होती, असे त्यांचे अर्धे आयुष्य सरले.

एक दिवस भर्तरी शिकारीसाठी वनात गेला असतांना आकाशातील सूर्यनारायण पुत्रमुख पाहून प्रेमविव्हळ झाले; पण एक खंत त्यांना त्रस्त करू लागली. ते मनात विचार करू लागले, "माझा एक पुत्र अगस्ती आणि दुसरा भर्तरी भूतालांवर नांदत आहेत. त्यांपैकी अगस्तीने योग साधनेचा मार्ग स्वीकारून योग्य केले आहे. पण भर्तरी राजवैभवात, भोग विषयांमध्ये रमला आहे हे बरे वाटत नाही. योगसाधनेद्वारा अत्युच्च ब्रम्हपद मिळवण्यास तो चुकला आहे. हा भोगातून कसा सुटावा? हा नवनाथांमधला द्रुमिल नारायणाचा अवतार असून, माझ्या तेजापासून जन्मला असूनही विषयरुपी अंधारात चाचपडतो आहे. याचे कल्याण होण्यासाठी काय करावे?" अशी विवंचना त्यांना त्रस्त करू लागली. काळजीने चिंताग्रस्त झालेले सूर्यदेव सौम्य रूप धारण करून भूतालांवर दत्तात्रेयांच्या आश्रमात गेले आणि म्हणाले, "हे योगद्रुमा दत्तात्रेया! माझे आपणाकडे एक काम आहे. त्याचा सत्य भावार्थ समजून घ्यावा. तुम्ही तर विजयप्रताप ध्वज म्हणून या भूतलावर मिरवत आहात. मच्छिंद्राप्रमाणे माझा पुत्र भर्तरी हा सुद्धा अवतारी आहे. हे महाराजा! आपण जगात अनेक सतशिष्य निर्माण केले असल्याने माझ्या पुत्राला सुद्धा त्याच कल्याणकारी मार्गाला लावावे ही माझी प्रार्थना आहे." त्यावर श्रीगुरुदेव दत्तात्रेय म्हणाले, "हे मित्रा! तू चिंता करू नकोस. भर्तरीनाथास माझा अनुग्रह प्राप्त होऊन तो, जोपर्यंत पृथ्वी अस्तित्वात आहे तोपर्यंत चिरंजीव होऊन उदंड कीर्तिवान होईल. हे भविष्य पूर्वीच निश्चित झालेले आहे. आपण स्वस्थ असावे. मी प्रयत्नपूर्वक भर्तरीस नाथपंथात विलीन करीन, आपण विश्वास ठेवावे." असे म्हणून दत्तगुरूंनी सूर्यास निरोप दिला.

इथे भर्तरी शिकारीसाठी अरण्यात शोधाशोध करीत भटकंती करीत होता. त्याच्याबरोबर मोठी सेना होती. पराक्रमी राजाच्या त्या पराक्रमी सैनिकांची शान काय वर्णावी? सुंदर सुंदर वस्त्रालंकार, रत्नालंकार, सुवर्णालंकार देहावर मिरवत त्यांनी जणू वैभवाचे प्रदर्शनच सदर केले होते. चमचम करणारी ती रत्ने पाहून असे वाटत होते की जणुं नक्षत्राचा

मोहोर आला आहे. शृंगारलेले हत्ती घोडे मिरवत होते. हत्तीच्या दातांना सोने मढवून हिरेमाणिक जडित सुवर्णकंकणांचे चुडे घातले होते. नक्षीकाम केलेल्या झुली झालरी पाठीवर झुलत होत्या. नवरत्नांनी शृंगारलेल्या सुवर्ण अंबारीचे कळस डोळे दिपवीत होते. सुवर्णमुकुट धारण केलेला भर्तरी आणि इतर सरदारांच्या अंगावरील सुवर्णवस्त्रे लक्ष वेधून घेत होती. माणिकमोत्यांनी सजविलेल्या अंबारीत भर्तरी बसला होता. हे अपार वैभवशाली दृश्य पाहून सूर्यदेव मनात सुखावून म्हणाला, "माझा पुत्र वैभवशाली झाला आहे." आणि कौतुकमिश्रित हर्षाने असतास गेला.

त्या घनघोर अरण्यात भर्तरीची शिकारगिरी अनेक दिवस चालली होती. चैत्र महिना सुरु झाला. मुलाचे कौतुक पाहण्याच्या उद्देशाने सूर्यदेव त्याठीकाणी काही काळ स्थिर होत असे पण त्याचा विपरीत परिणाम होऊ लागला. प्रखर सूर्यतेज एकाच जागी स्थिरावल्याने त्या अरण्यातील पाण्याचे साठे शुष्क झाले. भर्तरीसह सर्व सेना पाण्यासाठी तडफडू लागली. अवघ्या पंचक्रोशीत शोध घेऊनही थेंबभरही पाणी मिळत नव्हते. तहानेने सर्वांचेच प्राण कासावीस झाले. कुणाला मूर्च्छा आली, कुणी झाडांचा पाला चावू लागले. कुणी स्वमुत्राचे प्राशन करून तृष्णाशमन करू लागले. "पाणी पाणी" असा आक्रोश सुरु झाला. त्याला भर्तरीही उपवाद नव्हता. भर्तरीचाही प्राण कासावीस झाला होता. मुखाला कोरड पडली. जिव्हा आंत ओढली जात होती. श्वासोश्वास घेण्याचेही त्राण उरले नाही. प्राण कंठाशी आले. मोठीच समस्या निर्माण झाली.

अरण्यामध्ये दत्तगुरू भर्तरीच्या मागे अदृश्यावस्थेत फिरत होते. तेथे त्यांनी एक मायावी सरोवर निर्माण केले. निळेशार शीतल पाण्याने काठोकाठ भरलेल्या त्या सरोवराच्या सभोवार फळाफुलांनी बहरलेली वृक्षराजी होती, त्यावरील पक्ष्यांची किलबिल आणि पाण्यातील हंसाचे थवे जलविहार करीत आहेत, अशा त्या मायावी सरोवराच्या काठी दत्तात्रेयांनी एक पर्णकुटी उभारून त्यात ते जाऊन बसले. तृषार्त भर्तरी पाण्यासाठी कासावीस होऊन हिंडत असताना अचानक त्याला ते विहंगम सरोवर दिसले आणि त्याच्या आनंदाला पारावार राहिला नाही. देहभान हरपून तो धावला ओणवा होऊन पाण्याला स्पर्श करणार तोच वेषांतरातील दत्तगुरू झोपडीतून धावले आणि त्याच्यावर खेकसले, "अरे अरे! मारायचे आहे काय? स्वतःचे प्राण वाचव! माझ्या पाण्याला स्पर्शही करू नकोस. तू कुणाचा कोण आहेस ते आधी मला सांग." भर्तरी भानावर आला आणि भयापोटी नुसता टकमका त्यांच्याकडे पाहत राहिला. त्याला स्तब्ध पाहून दत्तात्रेय पुन्हा ओरडले, "अरे गप्प का? काहीतरी सांग, तुझे मातेपिता कोण? आणि गुरु कोण? सर्व खरे सांग आणि नंतरच पाणी प्राशन कर, नाहीतर नाहक मृत्यू पावशील." भर्तरीने भानावर येऊन नमन केले. आणि स्वतःच्या जन्मापासूनचे संपूर्ण कथेचे निवेदन केले.

श्रीदत्तगुरू म्हणाले, "गुरु कोण?" त्यावर "अजून गुरु केला नाही" असे उत्तर भर्तरीने दिले. त्या उत्तराने संतप्त झालेले श्रीदत्तगुरु म्हणाले, "अद्यापपर्यंत गुरु केला नाहीस? त्यामुळेच तू बुद्धीभ्रमिष्ट आहेस. तू पूर्वजन्माचा परम पापकर्मी असल्याने तुला कुणी गुरु मिळाला नाही. तरी हे दुष्टाचरणी, पापी माणसा, पाण्याला स्पर्श करू नकोस, तुझ्या स्पर्शाने निरगुरुत्वाचा विटाळ मानून पाणी आटून जाईल आणि तसे झाल्यास माझा शापाग्नी तुला क्षणार्धात भस्म करील." भर्तरी हताशपणे हात जोडून नम्रपणे म्हणाला, "महारज! तहानेने माझे प्राण जात आहेत, तरी आपणच मला अनुग्रह देऊन माझे प्राण वाचवा." त्याच्या विनंतीचा श्रीदत्तगुरूंवर काही परिणाम झाला नाही. ते म्हणाले, "तुला अनुग्रह देणे माझ्या मनाला पटत नाही. अरे, प्रत्यक्ष शिव आणि ब्रम्हासुद्धा माझ्या अनुग्रहासाठी याचना करतात, तेथे

तू एक क्षुद्र कीटक माझ्या अनुग्रहाची अपेक्षा करतोस, तुझ्यामध्ये अशी कोणती योग्यता आहे?" भर्तरी उत्तरला, "महाराज! आपण योग्य बोललात परंतु तहानेने मी व्याकूळ झालो आहे आपण संत महात्मे परमदयाळू आहात, दया, क्षमा, करणारे आहात. जगाचे दुःख, पाप नष्ट करणारे कृपावंत आहात तरी माझे प्राणरक्षण करून धर्माचरण पाळावे. मी आपणास शरण आलो आहे." दत्तात्रेय म्हणाले, "तुला अनुग्रह देईन परंतु याठिकाणी तू बारा वर्षे तप केलेस तर त्या तपाच्या पुण्याच्या अंशामुळे तू अनुग्रह घेण्यायोग्य होशील."

"हे कृपामूर्ती, सांप्रत माझे प्राण जात आहेत. प्राण वाचले नाहीत तर बारा वर्षे तप कसे घडेल? श्रीदत्तगुरू म्हणाले, "काया, वाचा, चित्त, मनाने पावित्र्य सांभाळीत बारा वर्षे तप करण्याचा संकल्प केलास तर पाणी प्राशन करण्याची अनुमती देईन!" हे ऐकून भर्तरीची मती गुंग झाली. प्राण कंठाशी आला आहे. तरीसुद्धा तो पुन्हा विचारपूर्वक बोलला, "मी अजून संसारातून मुक्त झालो नाही. पितृऋणांतून मुक्त झालो नाही. मातेला तीर्थयात्रा न घडल्याने मातृऋणांतून मुक्त झालो नाही. पुत्राचा विवाह करून सून आल्याशिवाय पुत्रऋणांतून मुक्ती नाही. अशा ओझ्यांतून मुक्त होण्यासाठी तुम्ही आणखी बारा वर्षे मला प्रपंच करण्याची संधी द्यावी. त्यानंतर आपण म्हणता त्याप्रमाणे मी संन्यास घेईन."

भर्तरीने असे म्हणताच श्रीदत्तत्रेयांनी कमंडलु भरून पाणी आणले आणि भर्तरीच्या ओंजळीत सोडून त्यांस संकल्प करावयास लावला. माथ्यावर वरदहस्त ठेवून कानात बीजमंत्र सांगून अनुग्रह दिला. नंतर त्यांनी स्वतःची ओळख सांगितली, "हे वत्सा! मला ओळख, मी अत्रीसुत दत्तात्रेय आहे. तू भाग्यवंत आहेस म्हणून माझा अनुग्रह प्राप्त झाला." असे म्हणून दत्तात्रेय मायावी सरोवरासह गुप्त झाले. भर्तरी कमालीचा चिंताग्रस्त झाला. अद्यापपर्यंत त्याला पाणी प्यावयास मिळाले नव्हते. मनात म्हणाला, "इतके सर्व केले ते व्यर्थ जाणार की काय?" मग आर्तपणे, "गुरुमहाराज! मला वाचवा, माझा प्राण जाऊ पाहत आहे. पाणी पाजा! पाणी!!" अशा हाका मारीत दुःख व्यक्त करू लागला. ते ऐकताच दत्तात्रेयांनी भोगावती नदीला आव्हान करताच ती विपुल पाणी घेऊन अवतारली तसेच कामधेनूचे चिंतन करून तिच्याकरवी मिष्टान्नाच्या राशी निर्माण केल्या. मग भर्तरीसह सर्व सेनेने आपली तृष्णा भागविली, स्नान केले आणि सुग्रास अन्नाचा आस्वाद घेऊन तृप्त झाले आणि अवंतिका नगरीकडे कूच केले. वनात आलेली भोगावती नदी तिच्या स्थानी परतली. कामधेनु स्वर्गात गेली आणि गुप्तावस्थेतील दत्तात्रेय अंतर्धान पावले.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने नष्ट झालेले अधिकार पुन्हा प्राप्त होतील.